**आस्थापना - कोकण विभाग**
**अकृषिक कामासाठीची ९१ पदे व अपर तहसिलदार शेतजमीन न्यायाधिकरण यांची ५९ पदे अशा आकृतीबंधाबाहेरील १५० अस्थायी पदांना दि.०१/१०/२०१८ ते दि.२८/०२/२०१९ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईएसटी-२०१८/प्र.क्र.५३/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २२ ऑक्टोबर, २०१८

**संदर्भ :-**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : संकिर्ण-१००२/प्र.क्र. ६६(भाग-२)/ई-८, दिनांक २०/०३/२००६.
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. इएसटी-२६०६/प्र.क्र.२०६/ई-८, दि. १३ डिसेंबर, २०१०
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : ईएसटी-२०१७/प्र.क्र. ३३/ई-८, दिनांक २१/०४/२०१७.
४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. ईएसटी-२०१७/प्र.क्र.३३/ई-८, दि.२३/१०/२०१७.
५) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांकः ईएसटी-२०१७/प्र.क्र.३१/ई-८, दि.०५/०२/२०१८
६) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांकः ईएसटी-२०१८/प्र.क्र.५३/ई-८, दि.१०/०४/२०१८
७) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०७/०९/२०१८

**प्रस्तावना:-**

वित्त विभागाच्या दि. ०५/०३/२०१८ च्या शासन निर्णयास अनुसरुन कोकण विभागातील उपजिल्हाधिकारी (अपिल्स) यांचे १ पद व अकृषिक कामासाठीची ९१ पदे, अपर तहसिलदार शेतजमीन न्यायाधिकरण यांची ५९ पदे अशा आकृतिबंधाबाहेरील एकूण १५१ अस्थायी पदांना दि. ०१/०३/२०१८ ते दि. ३०/०९/२०१८ या कालावधीसाठी महसूल व वन विभागाच्या संदर्भाधिन दि. १०/०४/२०१८ च्या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली होती.

२. वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.०७/०९/२०१८ च्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि. ०१/१०/२०१८ ते दि.२८/०२/२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत. त्यास अनुसरुन कोकण विभागातील उपजिल्हाधिकारी (अपिल्स) यांचे १ पद वगळता उर्वरित अकृषिक कामासाठीची ९१ पदे व अपर तहसिलदार शेतजमीन न्यायाधिकरण यांची ५९ पदे अशा आकृतिबंधाबाहेरील एकूण १५० अस्थायी पदांना वरील कालावधीसाठी मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

कोकण विभागातील उपजिल्हाधिकारी (अपिल्स) यांचे १ पद वगळता, अकृषिक कामासाठीची ९१ पदे, व अपर तहसिलदार शेतजमीन न्यायाधिकरण यांची ५९ पदे अशा आकृतिबंधाबाहेरील संदर्भाधीन क्र. ४ येथील दि. २१/०४/२०१७ च्या शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्रामधील आकृतीबंधाबाहेरील एकूण १५० अस्थायी पदांना **दिनांक १ ऑक्टोबर, २०१८ ते दिनांक २८ फेब्रुवारी, २०१९** या कालावधीसाठी वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०७/०९/२०१८ च्या शासन निर्णयातील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सदर प्रस्तावातील अस्थायी पदांवर होणारा खर्च "मागणी क्र. सी-१,२०५३-जिल्हा प्रशासन, (०९३) जिल्हा आस्थापना, (०१) सर्वसाधारण आस्थापना, (०१)(०१), आयुक्त कोकण, (२०५३ ००२८) ०१, वेतन" या लेखाशिर्षाखालील सन २०१८-२०१९ साठी मंजूर अर्थसंकल्पीय अनुदानातून भागविण्यात यावा.

३. **वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०७/०९/२०१८ च्या शासन निर्णयात दरम्यानच्या काळात सुधारित आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक असल्याचे तसेच यानंतर सुधारित आकृतीबंध निश्चित करण्याकरिता कालावधी वाढवून देण्यात येणार नाही, याची सर्व प्रशासकीय विभागांनी नोंद घेण्याबाबत वित्त विभागाने निर्देशित केले आहे.**

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०७/०९/२०१८ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१८१०२४१२४२०३३८१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Nilkanth Pandurang Awhad

Digitally signed by Nilkanth Pandurang Awhad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e42a88b7548c3a7d48b7a77d85de3524cf8f2e7e0f87091223ad803d4d4a2a31, cn=Nilkanth Pandurang Awhad
Date: 2018.10.24 12:47:36 +05'30'

**( नि. पां. आव्हाड )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
२) जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर/ठाणे/रायगड/रत्नागिरी/सिंधुदुर्ग/पालघर.
३) प्रधान महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा) -१, महाराष्ट्र, मुंबई.
४) अपर तहसिलदार, अंधेरी/कुर्ला-१/कुर्ला-३/बोरीवली-१/बोरीवली-२/ठाणे/कल्याण /भिवंडी/वसई/पालघर/जव्हार/रत्नागिरी (संबंधित जिल्हाधिका-यांमार्फत)
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
७) अप्पर कोषागार अधिकारी, कोकण भवन, नवी मुंबई.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/ पालघर/ रायगड/रत्नागिरी व सिंधुदुर्ग.
९) कार्यासन अधिकारी, (आ.पु.क./ व्यय-९), वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
१०) कार्यासन अधिकारी, कार्यसन ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११) निवड नस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.